सावित्र्यादि ब्रह्मचारित्रतरहित, मंत्रवेदाध्ययनरहित आणि केवल ब्राह्मणजाति मात्रण करून उपजीविका करणारे असे सहस्रशः जरी एकत्र मिळाले तत्रापि ती सभा नव्हे.

यं वदंति तमोभूत्वा मूर्खा धर्ममतद्विदः ॥
तत्पापं शतधा भूत्वा तद्वक्तॄननुगच्छति ॥ ११५ ॥

तमोगुणानें युक्त, मूर्ख, धर्म न जाणणारे असे होत्साते जे पापाचे प्रायश्चित्त सांगतात त्यांस, त्या पाप्याचें तें पाप शतगुणित होऊन प्राप्त होतें.

तदद्वोऽभिहितं सर्वं निःश्रेयसकरं परम् ॥
अस्मादप्रच्युतो विप्रः प्राप्नोति परमां गतिम् ॥ ११६ ॥

भृगु सांगतो कीं, हे ऋषिहो, तुह्मांस उत्तम कल्याणकारक असा मी धर्म सांगितला. ह्या धर्मापासून च्युत न होणारा, ह्मणजे यथोक्त धर्माचरण करणारा ब्राह्मण, मोक्षलक्षण गतीप्रत पावतो.

एवं स भगवान्देवो लोकानां हितकाम्यया ॥
धर्मस्य परमं गुह्यं ममेदं सर्वमुक्तवान् ॥ ११७ ॥

संपूर्ण ऐश्वर्य, वीर्य, यश, श्री, ज्ञान, आणि वैराग्य ह्या सहा गुणांनीं युक्त अतएव भगवान् देव मनु जो त्यानें लोकांचे हित व्हावें या इच्छेकरून याप्रमाणें परम गुह्य असा सर्व धर्म मजकारणें सांगितला.

सर्वमात्मनि संपश्येत्सच्चासच्च समाहितः ॥
सर्वं ह्यात्मनि संपश्यन्नाधर्मे कुरुते मनः ॥ ११८ ॥

ब्राह्मणानें निश्चित होऊन सत्, असत्, सर्व आत्म्याचे ठायीं ब्रह्मस्वरूपेंकरून पाहावें, सर्व पदार्थमात्रातें आत्मत्वानें पाहणाराला रागद्वेष प्राप्त होत नाहींत, व अधर्माचे ठायीं मन जात नाहीं.

आत्मैव देवताः सर्वाः सर्वमात्मन्यवस्थितम् ॥
आत्मा हि जनयत्येषां कर्मयोगं शरीरिणाम् ॥ ११९ ॥

आत्मा हाच इंद्रादिक सर्व देवता होत. हें सर्व जगत् आत्म्याचे ठायीं स्थित आहे. ह्या सर्व क्षेत्रज्ञादिकांस कर्मसंबंध आत्माच उत्पन्न करितो.

खं संनिवेशयेत्खेषु चेष्टनस्पर्शनेऽनिलम् ॥
पक्तिदृष्ट्योः परं तेजः स्नेहेऽपो गां च मूर्तिषु ॥ १२० ॥

मनसींदुं दिशः श्रोत्रे क्रांते विष्णुं बले हरम् ॥
वाच्यग्निं मित्रमुत्सर्गे प्रजने च प्रजापतिम् ॥ १२१ ॥

बाह्याकाश हृदयाकाशाचे ठायीं लीन करावें, ह्मणजे एकरूपानें धारण करावें. चेष्टा आणि स्पर्श ह्यांला कारणभूत जो देहस्थित वायु त्याचे ठायीं बाह्यवायु लीन करावा. बाह्य तेज उदरस्थ तेजाचे ठायीं लीनकरावें. बाह्य जल देहस्थ जलाचे ठायीं लीन करावें. पृथिवीचा भाग जें शरीर तें बाहेरच्या पृथ्वीभागाचे ठायीं लीन करावें. मनाचे ठायीं चंद्र,

सावित्र्यादि ब्रह्मचारिव्रतरहित, मंत्रवेदाध्ययनरहित आणि केवल ब्राह्मणजाति मात्र धारण करून उपजीविका करणारे असे सहस्रशः जरी एकत्र मिळाले तत्रापि ती सभा नव्हे.

यं वदंति तमोभूत्वा मूर्खा धर्ममतद्विदः ॥
तत्पापं शतधा भूत्वा तद्वक्तॄननुगच्छति ॥ ११५ ॥

तमोगुणानें युक्त, मूर्ख, धर्म न जाणणारे असे होत्साते जे पापाचे प्रायश्चित्त सांगतात त्यांस, त्या पाप्याचें तें पाप शतगुणित होऊन प्राप्त होतें.

तदद्वोऽभिहितं सर्वं निःश्रेयसकरं परम् ॥
अस्मादप्रच्युतो विप्रः प्राप्नोति परमां गतिम् ॥ ११६ ॥

भृगु सांगतो कीं, हे ऋषिहो, तुह्मांस उत्तम कल्याणकारक असा मी धर्म सांगितला. ह्या धर्मापासून च्युत न होणारा, ह्मणजे यथोक्त धर्माचरण करणारा ब्राह्मणादिक, मोक्षलक्षण गतीप्रत पावतो.

एवं स भगवान्देवो लोकानां हितकाम्यया ॥
धर्मस्य परमं गुह्यं ममेदं सर्वमुक्तवान् ॥ ११७ ॥

संपूर्ण ऐश्वर्य, वीर्य, यश, श्री, ज्ञान, आणि वैराग्य ह्या सहा गुणांनीं युक्त अतएव भगवान् देव मनु जो त्यानें लोकांचे हित व्हावें या इच्छेकरून याप्रमाणें परम गुह्य असा सर्व धर्म मजकारणे सांगितला.

सर्वमात्मनि संपश्येत्सच्चासच्च समाहितः ॥
सर्वं ह्यात्मनि संपश्यन्नाधर्मे कुरुते मनः ॥ ११८ ॥

ब्राह्मणानें निश्चित होऊन सत्, असत्, सर्व आत्म्याचे ठायीं ब्रह्मस्वरूपेंकरून पाहावें, सर्व पदार्थमात्रातें आत्मत्वानें पाहणाराला रागद्वेष प्राप्त होत नाहींत, व अधर्माचे ठायीं मन जात नाहीं.

आत्मैव देवताः सर्वाः सर्वमात्मन्यवस्थितम् ॥
आत्मा हि जनयत्येषां कर्मयोगं शरीरिणाम् ॥ ११९ ॥

आत्मा हाच इंद्रादिक सर्व देवता होत. हें सर्व जगत् आत्म्याचे ठायीं स्थित आहे. ह्या सर्व क्षेत्रज्ञादिकांस कर्मसंबंध आत्माच उत्पन्न करितो.

खं संनिवेशयेत्खेषु चेष्टनस्पर्शनेऽनिलम् ॥
पक्तिदृष्ट्योः परं तेजः स्नेहेऽपो गां च मूर्तिषु ॥ १२० ॥

मनसींदुं दिशः श्रोत्रे क्रांते विष्णुं बले हरम् ॥
वाच्यग्निं मित्रमुत्सर्गे प्रजने च प्रजापतिम् ॥ १२१ ॥

बाह्याकाश हृदयाकाशाचे ठायीं लीन करावें, ह्मणजे एकरूपानें धारण करावें. चेष्टा आणि स्पर्श ह्यांला कारणभूत जो देहस्थित वायु त्याचे ठायीं बाह्यवायु लीन करावा. बाह्य तेज उदरस्थ तेजाचे ठायीं लीनकरावें. बाह्य जल देहस्थ जलाचे ठायीं लीन करावें. पृथिवीचा भाग जें शरीर ते बाहेरच्या पृथ्वीभागाचे ठायीं लीन करावें. मनाचे ठायीं चंद्र,